प्रजासत्ताक दिनानिमित्त नवी दिल्ली येथे चित्ररथ संचलन-२०२५ ची प्रक्रिया राबविण्यासाठी वित्तीय मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२४/प्र.क्र.३४८/सां.का.-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ मार्च, २०२५.

**संदर्भ :-** पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण २०२४/ प्र.क्र.३४८/सां.का.४, दि. ०१ जानेवारी, २०२५.

**प्रस्तावना**:

प्रजासत्ताक दिनानिमित्त दिनांक २६ जानेवारी, २०२५ रोजी महाराष्ट्र राज्यातर्फे चित्ररथाचे संचलन करण्यासाठी चित्ररथ तयार करून नवी दिल्ली येथे होणाऱ्या कर्तव्यपथावरील संचलनमध्ये महाराष्ट्र राज्याच्यावतीने संचलन करण्याच्या सूचना प्राप्त झाल्या होत्या. त्यानुसार राज्य शासनामार्फत संचलन करण्यासाठी संरक्षण मंत्रालयासमोर ठेवण्यात आलेल्या विषयांपैकी “मधाचे गाव” हा विषय निश्चित केला. मात्र, सदरचा चित्ररथ हा कर्तव्यपथावरील संचलनामध्ये नसून, “भारतपर्व” येथे ठेवण्याबाबत केंद्र शासनाने कळविले. त्यानुसार सदरहू चित्ररथास साधारणपणे ₹६०.०० इतका रकमेस उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. आता, त्यास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

प्रजासत्ताक दिनानिमित्त दिनांक २६ जानेवारी, २०२५ रोजी महाराष्ट्र राज्यातर्फे नवी दिल्ली येथील “भारतपर्व” येथे प्रदर्शित करण्यासाठी तयार करण्यात येणाऱ्या चित्ररथाच्या ₹५७,६७,६६१/- (अक्षरी रुपये सत्तावण लक्ष सदुसष्ठ हजार सहाशे एकसष्ठ फक्त) इतक्या रक्कमेस या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च लेखाशिर्ष मागणी क्र झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती यांचे प्रचालन, (०४) (०१) इतर महोत्सव, (२२०५ १६०५) ५० इतर खर्च (योजनांतर्गत) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्चास वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/विनिमय, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५, उपविभाग ३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७(२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मान्यता देण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४ व १२ फेब्रुवारी, २०२५ मधील सर्व परिच्छेद परीशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. १६१/२०२५, व्यय १५, दि. ०५/०३/२०२५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३२७१५५८१७५६२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.03.27 16:00:56 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.४ ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र , मुंबई
११.महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) - २ महाराष्ट्र, नागपूर
१२.निवड नस्ती, सां.का.४